तामोरे-लेटर ३

महाराष्ट्र राज्य अपंग कल्याण कृती आराखडा-२००१
अंमलबजावणी करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग
परिपत्रक क्र.संकीर्ण-२००१/प्र.क्र.१९५/सुधार-३,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ डिसेंबर २००१

# परिपत्रक :

अपंग व्यक्ती(समान संधी,हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ हा फेब्रुवारी १९९६ पासून अंमलात आलेला आहे. या कायद्यातील तरतूदींची प्रभावीरित्या अंमलबजावणी करण्यासाठी एक सर्व समावेशक असा विविध मंत्रालयीन विभागांशी विचारविनिमय करुन सामाजिक न्याय विभागाने महाराष्ट्र राज्य अपंग कल्याण कृती आराखडा २००१ तयार केला असून त्यास शासनाने मान्यता दिली आहे. सदर कृती आराखडयाचा कालावधी ५ वर्षांचा ठरविण्यात आला असून तो १० व्या पंचवार्षिक योजनेतर्गत सन २००२-२००६ या कालावधीत प्रामुख्याने राबविण्यात येणार आहे. अपंग व्यक्तींची लोकसंख्या व उपलब्ध स्त्रोत लक्षात घेऊन त्यांचे जीवन सुसहय व्हावे याकरिता आवश्यक असलेल्या गरजा, अपंग व्यक्तींचे शैक्षणिक,आर्थिक,आरोग्यविषयक पुनर्वसन करण्याच्या दृष्टीने या आराखडयाची विभागणी खालील प्रमुख शिर्षकात करण्यात आली आहे:-

१) आरोग्याची प्रभावी संकल्पना
२) शिक्षणासाठी संपूर्ण संधी
३) रोजगार व स्वयंरोजगार विषयक उपाययोजना
४) अडथळा विरहित मुक्त संचार व्यवस्था
५) माहिती व जनसंपर्क विषयक बाबी
६) सकारात्मक कृती व विधी विषयक उपाययोजना
७) प्रभावी अंमलबजावणी यंत्रणा
८) वित्तीय व्यवस्था

महाराष्ट्र अपंग कल्याण कृती आराखडा-२००१ ची प्रत सोबत जोडली आहे.

२. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार सदर आराखडयाची अंमलबजावणी खालीलप्रमाणे करण्यात यावयाची आहे:-

१) कृती आराखडयाची अंमलबजावणी संबंधित प्रशासकीय विभागांनी करावी. समन्वयाची जबाबदारी सामाजिक न्याय विभागाची राहील.

२) कृती आराखडयाची अंमलबजावणी करण्यासाठी निधी/कर्मचा-यांची उपलब्धता संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या निधीमधून/कर्मचा-यांमधून करावी.

३) सर्व साधारण स्वरुपाच्या योजना ज्याचा लाभ सर्वांसाठी अपेक्षित अशा योजना/प्रकल्प यांची आखणी तसेच अंमलबजावणी करताना सर्व प्रकारच्या अपंगांच्या हिताची जपणूक होईल याची विभागांनी काळजी घ्यावी.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी शासनाने घेतलेल्या वरील निर्णयांची अंमलबजावणी काटेकोरपणे करावी. तसेच अपंग व्यक्ती(समान संधी,हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील कलम ७३(४) मधील तरतुदींन्वये अपंगांसाठी तयार करण्यात येणा-या योजनांना विधानमंडळाची मान्यता घेण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. (अधिनियमाची प्रत सोबत जोडली आहे)

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(सु.व.चव्हाण)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
(कृती आराखडयाच्या प्रतीसह)
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
संचालक,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हापरिषद
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हापरिषद
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री(स.क.) व राज्यमंत्री(स.क.) यांचे खाजगी सचिव
सचिव(सा.न्या.) यांचे स्टाफ ऑफिसर
सर्व कार्यासने,सा.न्या.,सां.का.,क्री.व वि.स.विभाग
निवड नस्ती का.सुधार-३